**<u>महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या अधिकारी/कर्मचारी यांचे वेतन अदा करण्याबाबत...</u>**

**महाराष्ट्र शासन**
**गृह विभाग**
**शासन निर्णय क्र. एसटीसी-०२२३/प्र.क्र.८७/परि-१**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १० एप्रिल, २०२३.

**<u>संदर्भ</u>** :-

उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांचे पत्र क्र.राप/लेखा/अंववि/४२९, दि.१७.०२.२०२३.

**<u>प्रस्तावना</u> :-**

मा.उच्च न्यायालय, मुंबई येथे दाखल रिट याचिका (स्टॅम्प) क्र.२१६९९/२०२१, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ विरुध्द संघर्ष एस.टी. कामगार संघटना आणि इतर प्रकरणी मा.उच्च न्यायालय, मुंबई यांच्या आदेशानुसार दि.०८.११.२०२१ च्या शासन निर्णयान्वये मा.मुख्य सचिव यांच्या अध्यक्षतेखाली त्रिसदस्यीय समिती स्थापन करण्यात आली. सदर त्रिसदस्यीय समितीने त्यांच्या अहवालात पुढीलप्रमाणे शिफारस केली आहे:-

"महामंडळाची सध्याची आर्थिक स्थिती लक्षात घेता, राज्य शासनाने अर्थसंकल्पीय तरतूद करून महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या वेतनासाठी किमान पुढील ४ वर्षांसाठी निधी उपलब्ध करून देण्यात यावा. महामंडळाच्या आर्थिक कामगिरीचा आढावा घेऊन हे आर्थिक सहाय्य पुढे सुरू ठेवण्याबाबत योग्य वेळी निर्णय घेण्यात यावा."

२. सदर त्रिदस्यीय समितीच्या अहवालास मंत्रीमंडळाने दि.२३.०३.२०२२ रोजीच्या बैठकीत मान्यता दिली आहे. त्याअनुषंगाने संदर्भाधिन पत्रान्वये उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई यांनी रा.प.महामंडळाच्या कर्मचारी/अधिकारी यांच्या दर महिन्याच्या वेतनासाठी अर्थसहाय्य म्हणून दरमहा महामंडळास अर्थसहाय्य अदा करण्याबाबत निर्णय घेण्याची विनंती केली आहे. त्यानुसार रा.प.महामंडळाच्या कर्मचारी/अधिकारी यांचे दर महिन्याचे वेतन अदा करण्यासाठी अर्थसहाय्य उपलब्ध करून देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्यानुषंगाने शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**<u>शासन निर्णय</u> :-**

मा.मंत्रीमंडळाने स्विकारलेल्या शिफारशीच्या अनुषंगाने महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळाच्या अधिकारी/कर्मचारी यांच्या वेतनासाठी खालीलप्रमाणे सुचना देण्यात येत आहेत:-

(१) रा.प.महामंडळाच्या दरमहा उत्पन्नातून इंधनावरील, वाहनांच्या देखभाल-दुरुस्तीवरील व वेतनावरील खर्च भागविण्यासाठी दरमहा जेवढ्या रकमेची तुट निर्माण होत आहे, तेवढी रक्कम रा.प.महामंडळाला शासनाकडून अर्थसहाय्य म्हणून लेखाशिर्ष २०४१ ००१८-३३ अर्थसहाय्य अंतर्गत उपलब्ध करुन देण्यात येईल.

(२) सदर अर्थसहाय्य दि.३१ मार्च, २०२४ पर्यंत लागू राहील.

(३) रा.प.महामंडळाच्या उत्पन्न व खर्चाचा दर तिमाहीने आढावा घेवून वेतनासाठी आर्थिक सहाय्य पुढे सुरु ठेवावे किंवा कसे याबाबत योग्य वेळी निर्णय घेण्यात येईल.

(४) महामंडळास आपला खर्च भागविण्यासाठी जितक्या रकमेची तूट निर्माण होत आहे ती भरुन काढण्यासाठी तातडीच्या उपाययोजना करणे आवश्यक आहे. रा.प.महामंडळाने अशा मदतीसाठी कायमस्वरुपी शासनावर अवलंबून राहू नये. रा.प.महामंडळाच्या कर्मचाऱ्यांच्या वेतनावरील खर्च व प्रलंबित देणी भागविण्याची जबाबदारी महांडळाची आहे. राज्य परिवहन महामंडळाने सध्याच्या उत्पन्नात वाढ करुन महामंडळ स्वयंपूर्ण करण्यासाठी प्रयत्न करावेत.

(५) सदर खर्च “मागणी क्रमांक बी-३, लेखाशिर्ष २०४१, वाहनांवरील कर (००) ००१, संचालन व प्रशासन (०१) परिवहन आयुक्त (०१) (०१) आस्थापना - परिवहन आयुक्त, (दत्तमत्त) (अनिवार्य) (२०४१ ००१८) ३३, अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

(६) यासाठी परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना प्राधिकृत करण्यात येत असून त्यांच्या कार्यालयातील आंहरण व संवितरण अधिकारी असलेले लेखाधिकारी यांनी सदर रक्कम आंहरित करुन महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळास अदा करण्याबाबत आवश्यक ती कार्यवाही करावी.

३. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.१६१/२०२३/व्यय-८, दि.२४.०३.२०२३ अन्वये प्राप्त झालेल्या सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेतांक २०२३०४१०१९०३०२८८२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

BHIKAN ONKAR THAKUR

Digitally signed by BHIKAN ONKAR THAKUR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT, 2.5.4.20=cb64a92ffb1a1fc675b87b99d133c8e4ffed848f8ec9727d5082eb07dbbe3343, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=2CF77A3A2916BE200D3D9A0961DF4F9F77CC14E167C7FCEC2EA903E779A2239A, cn=BHIKAN ONKAR THAKUR
Date: 2023.04.11 11:52:24 +05'30'

**( भि. ओं. ठाकूर )**
**कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१) मा. राज्यपालांचे सचिव, राजभवन , मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई.
३) मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई.
४) मा. सभापती, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
५) मा.अध्यक्ष , महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
६) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान परिषद यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
७) मा. विरोधी पक्ष नेता, महाराष्ट्र विधान सभा यांचे खाजगी सचिव, विधान भवन, मुंबई.
८) मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
९) प्रधान सचिव (परिवहन), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१०) परिवहन आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
११) उपाध्यक्ष व व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.
१२) वित्तिय सल्लागार व मुख्य लेखा अधिकारी, महाराष्ट्र राज्य मार्ग परिवहन महामंडळ, मुंबई.

१३) महालेखापाल १/२ (लेखा व अनुज्ञेयता /लेखा परिक्षा), महाराष्ट्र, मुंबई / नागपूर.
१४) महालेखापाल (वाणिज्यिक लेखा परिक्षा), मुंबई.
१५) कक्ष अधिकारी (अर्थ-१), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.
१६) कक्ष अधिकारी (व्यय-८), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१७) निवडनस्ती, कार्यासन, परिवहन-१, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई.